**महात्मा ज्योतिबा फुले संशोधन व प्रशिक्षण संस्था (महाज्योती) या संस्थेची नागपूर येथे १२ मजल्यांच्या इमारत बांधकामास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.....**

**महाराष्ट्र शासन**
**इतर मागास बहुजन कल्याण विभाग**
**शासन निर्णय क्र. महाज्यो २०२२/प्र.क्र. १७८/संस्था**
हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा मार्ग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक :- १८ जुलै, २०२४

**संदर्भ:-** १. व्यवस्थापकीय संचालक, महात्मा ज्योतिबा फुले संशोधन व प्रशिक्षण संस्था (महाज्योती), नागपूर यांचा दि. ०५.१२.२०२२ रोजीचा प्रस्ताव.

२. शासन पत्र क्र. बैठक-२०२३/ प्र.क्र. ३०/ इमा-१, सार्वजनिक बांधकाम विभाग यांचे दि. १३.०७.२०२३ रोजीचे इतिवृत्त

३. शासन निर्णय समक्रमांक दि. १३.१२.२०२३

४. व्यवस्थापकीय संचालक, महात्मा ज्योतिबा फुले संशोधन व प्रशिक्षण संस्था (महाज्योती), नागपूर यांचा दि. ०६.०२.२०२४ रोजीचा सुधारित प्रस्ताव.

५. शासन पत्र क्र. बैठक-२०२४/ प्र.क्र.४३/ इमा-१, सार्वजनिक बांधकाम विभाग यांचे दि. ०६.०७.२०२४ रोजीचे इतिवृत्त

**प्रस्तावना:-**

महात्मा ज्योतिबा फुले संशोधन व प्रशिक्षण संस्था (महाज्योती) या संस्थेची नागपूर येथील सर्व्हे नं. १६९२ खसरा क्र. ६७ मौजा सिताबर्डी येथे १२ माळयांची इमारत बांधण्यासाठी रु. ८०.१८ कोटी इतक्या रकमेच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्याचा प्रस्ताव महाज्योती कार्यालयाच्या संदर्भ क्र. १ च्या पत्रान्वये शासनास सादर करण्यात आला होता. सदर प्रस्तावास सार्वजनिक बांधकाम विभागाच्या उच्चस्तरीय समितीने रु. ५२.७५ कोटी इतक्या अंदाजित खर्चास मान्यता दिली होती. त्यानुसार दि. १३.१२.२०२३ रोजी शासन मान्यतेचे आदेश निर्गमित करण्यात आले होते. तथापि, संदर्भ क्र. ४ नुसार व्यवस्थापकीय संचालक, महाज्योती नागपूर यांनी सुधारित प्रस्ताव सादर केला आहे. त्यानुसार, सार्वजनिक बांधकाम विभागाच्या उच्चस्तरीय सचिव समितीने संदर्भ क्र. ५ अन्वये दिलेल्या मान्यतेनुसार महाज्योती संस्थेच्या प्रस्तावित १२ माळयाच्या इमारत बांधकामासाठी सुधारित खर्चाच्या प्रस्तावास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

उपरोक्त संदर्भ क्र. ३ चा शासन निर्णय अधिक्रमित करण्यात येत आहे.

महात्मा ज्योतिबा फुले संशोधन व प्रशिक्षण संस्था (महाज्योती) या संस्थेची नागपूर येथील सर्व्हे नं. १६९२ खसरा क्र. ६७ मौजा सिताबर्डी येथे १२ माळयांची प्रशासकीय इमारत बांधण्यासाठी उच्चस्तरीय सचिव समितीने संदर्भ क्र ५ अन्वये दिलेल्या मान्यतेनुसार, सदर इमारती साठीचे एकुण क्षेत्रफळ ११३८९.४६ चौ. मीटर असून बांधकामाचा दर रु. ३००००/- प्रती चौ. मी असा आहे. सदर बांधकाम खर्चास अंदाजे रुपये ६०.०८ कोटी (रु. साठ कोटी आठ लक्ष फक्त)इतक्या रकमेच्या अंदाजपत्रकास खालील अटींच्या आधिन राहून मान्यता देण्यात येत आहे. सदरचे अंदाजपत्रक सन २०२२-२३ च्या दरसुचिवर आधारित आहे.

**०२.** सदर समितीने काम करण्याआधी नकाशातील क्षेत्रफळ परिमाणाची खात्री करण्याच्या अटीच्या अधीन राहून, सदर मान्यता देण्यात येत आहे. सोबत Recapitulation Sheet जोडली आहे.

१. काम सुरु करण्यापूर्वी नमुना नकाशा, मांडणी नकाशा तसेच विस्तृत नकाशास वस्तुविशारदांकडून मंजूरी घेऊनच सुरु करावे.

२. ढोबळ स्वरुपात धरण्यात आलेल्या तरतूदींबाबत काम करतेवेळी विस्तृत अंदाजपत्रक करूनच काम हाती घ्यावे.

३. सदर बांधकामासाठी होणारा खर्च उपलब्ध असलेल्या नियतव्ययामधून करण्यात यावा.

४. सदर कामाची ई-निविदा करतांना कामाचे तुकडे न करता एकत्रित निविदा करण्यात यावी.

५. प्रत्यक्ष काम करतेवेळी पर्यावरण विभाग, शासन निर्णय क्र. इएनव्ही-२०१३/प्र.क्र. १७७/तां. क्र. १, दि. १०.०१.२०१४ मध्ये उल्लेख करण्यात आलेल्या मार्गदर्शक तत्वांनुसार कार्यवाही करण्यात यावी.

६. सार्वजनिक बांधकाम विभागाच्या शासन निर्णय क्र. बीडीजी २०१७/ प्र.क्र. ६०/ इमा-२, दि. ०७.०७.२०१७ अन्वये कार्यवाही करण्यात यावी.

७. नियोजित जागा उपभोक्ता विभागाच्या ताब्यात असल्याचे प्रमाणपत्र प्राप्त करून सदर कामाच्या निविदा सूचना प्रसिध्द करण्यात याव्यात.

८. प्रस्तावित करण्यात आलेल्या इमारतीच्या जोते क्षेत्रफळ कर्मचारीवर्ग यांच्या अनुज्ञेय मानकाप्रमाणे असल्याची खातरजमा करण्यात यावी.

९. उक्त बांधकामाची कार्यान्वयीन यंत्रणा NIT( Nagpur Improvement Trust ) आहे.

१०. इमारतीचे जोते क्षेत्रफळ व शासकीय इमारती यांच्या अनुज्ञेय मानकाप्रमाणे असल्याच्या तसेच हे काम खाजगी वास्तुशास्त्रज्ञांकडून करण्यात येत असल्याने त्या इमारतीचे आराखडे हे सार्वजनिक बांधकाम विभाग/ शासकीय इमारतीच्या अनुज्ञेय मानकांस अनुसरुन असण्याची खातरजमा करावी.

११. सदर कामाकरीता सुधारीत प्रशासकीय मान्यतेची आवश्यकता लागणार नाही या दृष्टीने विशेष दक्षता घेण्यात यावी.

**०३.** यावर होणार खर्च २२२५- अनु. जाती, अनु. जमाती व इतर मागास वर्ग यांचे कल्याण, ०३- मागासवर्गीयांचे कल्याण, १०२, आर्थिक विकास, ०१- विमुक्त जाती भटक्या जमाती, इतर मागास प्रवर्ग कल्याण, (०१) (०९) महात्मा ज्योतिबा फुले संशोधन व प्रशिक्षण संस्था (महाज्योती), (२२२५ एफ ४९७), ३५, भांडवली मत्यांच्या निर्मितीकरीता अनुदान या लेखाशिर्षांतर्गत सन २०२४-२५ करीता करण्यात आलेल्या तरतुदीतून भागविण्यात यावा. उपरोक्त बाबींकरीता प्राप्त होणारा निधी अन्य बाबींवर खर्च करण्यात येउ नये.

**०४.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संगणक सांकेतांक क्र. २०२४०७१८१५०४५१९२३४ असा आहे. सदर आदेश डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

VARSHA SUNIL SAMANT

Digitally signed by VARSHA SUNIL SAMANT
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=OTHER BACKWARD BAHUJAN WELFARE DEPARTMENT, 2.5.4.20=765dae4fef3315c4544a15270edc443fbacf630172f5e6b732d16b64198d81ba, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=AF4E3A3AADACA1026547EF614DF4DE89D66994806D3760116B32BB3AADEAF9FB, cn=VARSHA SUNIL SAMANT
Date: 2024.07.18 15:16:38 +05'30'

**( व. सु. सामंत )**

**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. व्यवस्थापकीय संचालक, महाज्योती, नागपूर
२.उप सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग (इमारती-१/२), मंत्रालय, मुंबई-३२
३.मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ , नागपूर
४.अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, नागपूर
५.कार्यकारी अभियंता , सार्वजनिक बांधकाम मंडळ, नागपूर
६.महालेखापाल महाराष्ट्र १/२ (लेखापरीक्षा/लेखाअनुज्ञेयता ), मुंबई/नागपूर,
७. जिल्हा कोषागार अधिकारी, नागपूर
८. निवडनस्ती